**महाराष्ट्र राज्यातील कोरोना विषाणू प्रसारावरील प्रतिबंधात्मक उपाय म्हणून लागू करण्यात आलेल्या लॉकडाऊनच्या कालावधीमध्ये गर्भवती महिला तसेच व्याधिग्रस्त अधिकारी/ कर्मचारी यांच्या शासकीय कार्यालयातील उपस्थितीबाबत स्पष्टीकरणात्मक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : समय २०२०/प्र.क्र.४१/१८(र.वका.)**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०००३२

दिनांक : २३ जुलै, २०२०

वाचा:- :

१. केंद्र शासनाच्या लोकतक्रार, पेन्शन, कार्मिक व प्रशिक्षण मंत्रालयाचे क्र.११०१३/९/२०१४-Estt-(A III) दिनांक १९ मे, २०२० चे आदेश.
२. शासन आदेश, आपत्ती व्यवस्थापन व मदत व पुनवर्सन, क्रमांक :डीएमयू २०२०/ सीआर ९२/डीआयएसएम-१, दिनांक २९ जून, २०२०.

**शासन निर्णय:-**

कोरोना विषाणूंचा (COVID-१९) प्रसार राज्यातील शासकीय कार्यालयांमध्ये होऊ नये, तसेच राज्यातील अधिकारी / कर्मचारी यांना त्याचा संसर्ग होऊ नये म्हणून विविध प्रतिबंधात्मक उपाययोजना राबविण्याच्या दृष्टीने शासकीय कार्यालयातील उपस्थिती रोटेशन पद्धतीने नियंत्रित करण्याबाबत वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. गर्भवती महिला तसेच व्याधिग्रस्त शासकीय अधिकारी / कर्मचारी हे कोरोना विषाणूंच्या संसर्गास सहजपणे बळी पडू शकत असल्याने ज्या शासकीय कार्यालयातील उपस्थिती रोटेशन पद्धतीने नियंत्रित करण्यात आलेली आहे, तेथे गर्भवती महिला तसेच व्याधिग्रस्त शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केल्यानंतर कार्यालयात उपस्थित राहण्यापासून शक्यतोवर सूट देण्यात यावी, असे केंद्र शासनाच्या दिनांक १९ मे, २०२० च्या कार्यालयीन आदेशान्वये सूचित करण्यात आलेले आहे. केंद्र शासनाच्या आदेशास अनुसरुन सर्व मंत्रालयीन तसेच मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील विभाग / कार्यालयांमधील गर्भवती महिला तसेच व्याधिग्रस्त शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना कार्यालयात उपस्थित राहण्यापासून सूट देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

३. सबब शासनाने असा निर्णय घेतला आहे की, गर्भवती महिला तसेच अवयव प्रत्यारोपण केलेले, केमो थेरपी, इम्युनोसप्रेसिव्ह थेरपी घेत असलेले शासकीय अधिकारी कर्मचारी हे कार्यालयात उपस्थित राहण्यापासून सूट मिळण्यास पात्र असतील. त्यासाठी त्यांनी वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

४. वरील परिच्छेद-३ संदर्भात संबंधित मंत्रालयीन विभाग / कार्यालये यांना अडचणी / शंका असल्यास त्यांनी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सल्ल्याने उचित निर्णय घ्यावा.

५. ज्या क्षेत्रातील शासकीय कार्यालयामध्ये शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार अधिकारी व कर्मचारी यांची उपस्थिती रोटेशनने नियंत्रित करण्यात आलेली आहे, अशा कार्यालयांमधील गर्भवती महिला तसेच व्याधिग्रस्त अधिकारी / कर्मचारी यांना परिच्छेद-३ प्रमाणे कार्यालयामध्ये उपस्थित राहण्यापासून सूट देता येईल. तथापि अन्य कार्यालयांमध्ये त्यांची उपस्थिती अनिवार्य राहील.

६. ज्या अधिकारी / कर्मचारी यांना कार्यालयात उपस्थित राहण्यापासून सूट मिळालेली आहे, त्यांनी कार्यालयातील त्यांचेकडील महत्वाच्या व तातडीच्या शासकीय कामकाजाचा निपटारा होण्याच्या दृष्टीने त्यांचे मोबाईल क्रमांक तसेच ई-मेल आयडी कार्यालयास उपलब्ध करुन दयावेत व दिलेल्या मोबाईल क्रमांकावर उपलब्ध रहावे.

७. सदरचे सूचना पुढील आदेशापर्यन्त लागू राहतील.

८. हा शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सल्ल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्याwww.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२००७२३१३१५४६०४०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajesh Bhaskar Gaikwad

Digitally signed by Rajesh Bhaskar Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5b1378a498cdff3fdd9ea5370b71fae3eca97e85924d0e443758ade5f0221f9a, serialNumber=26e171ec96c63f6333217d12fb6da1c5a800ce18a7a6fd59abf19b8ed3f02a91, cn=Rajesh Bhaskar Gaikwad
Date: 2020.07.23 14:52:07 +05'30'

**( रा. भा. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती),
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
६. मा. मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव(५ प्रती), मंत्रालय, मुंबई ४०००३२.

७. मा.उपमुख्य मंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
८. सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१०. मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
११. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१३. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
१४. प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,
१५. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१७. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१८. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१९. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई,
२०. सर्व विभागीय आयुक्त,
२१. आयुक्त, सर्व महानगर पालिका,
२२. व्यवस्थापकीय संचालक, BEST महामंडळ, मुंबई
२३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, मुंबई
२४. सर्व जिल्हाधिकारी,
२५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख /प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती ),
२८. अध्यक्ष/सचिव, महाराष्ट्र राज्य अपंग कर्मचारी संघटना, मुंबई - ३२.
२९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई ४०००२०.
३०. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
३१. नॅशनलीस्ट काँग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ४०००३८.
३२. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.
३३. बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, प्लॉट नं. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०००१४.
३४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४००००४.

३५. भारतीय कम्युनिस्ट(मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल,
ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०००१३.
३६. महाराष्ट्र नवनिर्माण सेवा, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०००२८.
३७. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ४०००३२
३८. निवड नस्ती (का.१८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई४०००३२.